NET अक्षरी

ई साहित्य प्रकाशन

नेटाक्षरी

अंक २६ दिनांक ११ मे २००९

# नेटाक्षरी

नाही कुणी रे अपुले
प्राणांवर नभ धरणारे
दिक्काल धुक्याच्या वेळी
हृदयाला स्पंदविणारे
–ग्रेस

अतिथी संपादक
श्री. अक्षयकुमार काळे (नागपूर)

यजमान संपादक
सौ. सुरुचि नाईक,(नागपूर)
सचिन काकडे (मुंबई)

सहसंपादक
नाम गुम जायेगा (ठाणे)
सोनाली घाटपांडे (पुणे)
आनंद माने (सोलापूर)
रेणुका रेपाळ (अमेरिका)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
अहं ब्रम्हास्मि (पुणे)
सारंग भणगे (पुणे)

## नेटाक्षरी सादर करीत आहे
## ग्रेस विशेषांक–

# "ग्रेस विषयी"




नादाच्या लयीत संध्यासमयी धुक्याच्या पदरातून ज्याची कविता सुरताल जोजवित त्याच्या ओठावर ओठ टेकते आणि त्याला भासू लागतात दुःखाचे ओळखीचे पदरव! तो बाहू पसरून उभा असतो गळाभेट घेण्यासाठी आणि ते दुःख देखील असते तत्पर...त्याच्याच साठी! कारण काव्य, नाद, सूर ,लय आणि हृदय देवून दुःखालाही ममतेची माया देवून जीवंतपणाची जाणीव देणारा फक्त तोच एकमेव आहे, तोच आहे ..... दुःखांचा महाकवी...कवी ग्रेस.

मित्रहो, आजचा हा अंक या महाकवीला अर्पण.आज १० मे, कवी ग्रेस यांचा जन्मदिवस आणि म्हणूनच शुभेच्छांसह आजचा हा अंक कवी ग्रेस यांच्या विषयी.

# "ग्रेस विषयी"





*"ग्रेस विषयी" ह्या अंकाचं नाव " ग्रेस विषयी" हे ठेवण्याचंही एक कारण आहे! ग्रेस यांच्या कविता जशा मनाला कुठल्याशा खोल अवस्थेत घेऊन जातात तसेच त्यांच्या विषयी, त्यांच्या काव्यनिर्मिती विषयी मनात अनेक प्रश्न उभे राहतात. या प्रश्नांची उत्तरं खुदद कवी ग्रेस ने दिली तर ?... मित्रांनो, तसे झाले आहे..आपल्या या अंकाचे अतिथी संपादक, कवी ग्रेस यांचे शिष्य व मित्र असलेल्या काळे सरांनी १९८३ मधे ग्रेस यांची प्रदीर्घ मुलाखत घेतली. ती संपूर्ण मुलाखत एकत्रित केलेलं पुस्तक या वर्षाच्या सुरवातीस प्रकाशित झालं, त्याचं नाव "ग्रेस विषयी" ! काळे सरांचे बेधडक प्रश्न आणि ग्रेस यांची त्यांच्या व्यक्तित्वाप्रमाणेच प्रामाणिक उत्तरं असं हे पुस्तक, आणि ग्रेस विषयीच असलेला असा हा अंक आपल्यापुढे सादर करीत आहोत.*

कंठात दिशांचे हार, निळा अभिसार, वेळूच्या रानी
झाडीत दडे, देऊळ गडे, येतसे जिथुन मुलतानी

–ग्रेस

## आजचे अतिथी संपादक – ओळख



डॉ.अक्षयकुमार काळे
जन्म २७ जुलै १९५३

१९७४ ला नागपूर विद्यापिठातून
एम. ए. ला
सर्वप्रथम. पीएचडी साठी
संशोधन शिष्यवृत्ती.

१९८० ला स्वातंत्र्योत्तर मराठी
काव्य प्रवाह या विषयावर
पी.एच.डी. आणि १९९१ मध्ये
"अर्वाचीन मराठी काव्यदर्शन"
या ग्रंथावर डी.लिट

**प्रकाशित ग्रंथः**

सूक्त संदर्भ १९८५,
गोविंदाग्रज समिक्षा (संपादित) १९८५
कविता कुसुमाग्रजांची १९८७
अर्वाचीन मराठी काव्यदर्शन १९९१
मर्ढेकरांची कविता, २००६

**पुरस्कारः**

विदर्भ साहित्य संघाचा कुसुमानिल
पुरस्कार,२०००
द. दि. पुंडे समीक्षामित्र ग्रंथ श्रेष्ठता
पुरस्कार २०००
महाराष्ट्र शासनाचा नरहर कुरुंदकर
पुरस्कार २००६
महाराष्ट्र सारस्वत पुरस्कार वणी
२००७
या व्यतिरिक्त अनेक पुरस्कार, सन्मान
चिन्हे व अनेक संमेलनांचे
अध्यक्षपद.

## "ग्रेस विषयी" मधून थोडसं...

ग्रेस ने ग्रेस हेच नाव का घेतलं असा प्रश्न प्रत्येकालाच पडला असणार!
काळे सरांशी बोलताना या प्रश्नाचा उलगडा दुसऱ्या एका प्रश्नाच्या
माध्यमातून झाला,तो प्रश्न व ते उत्तर असे आहे.

**प्रश्न : इन्ग्रिड बर्गमनला तुम्ही संध्याकाळच्या कविता अर्पण केल्या,
त्या बाबतीत काही?**

**उत्तर : इन्ग्रिडची आणि माझी पहिली भेट "इन ऑफ द सिक्स्थ हॅपिनेस हया बोलपटात झाली. त्यात ती एका भाववृत्तीत सापडली असताना तिच्याबद्दल एक साधे वाक्य येते "शी इज इन ग्रेस"मला भास झाला, तिने हलकिशी शीळ घातली आहे, त्या लहरीने माझ्या आत्म्यावरची धूळ उडते आहे. माझ्या प्रतिभारूपाचा पहिला साक्षात्कार मला इन्ग्रिड मधे झाला. पुढे रामदास भटकळ व तारा वनारसे तिला लंडनमधे भेटले असताना तिने माझ्यासाठी तिच्या स्वाक्षरीचा तिचा एक फोटो पाठवला. तिचे ऋण** कसे आठवित राहावे?मग मी "ग्रेस" हे नाव धारण केलं. परवाच ती गेली. माझी तिची शेवटची भेट झाली ती "द वॉक इन स्प्रिंग" मधे.वसंतातला पाऊस इतका कृतघ्न निघेल असं मला कधीच वाटलं नाही. त्याचे ऋतू प्रवण मी प्राणपणाने जपले आणि एका मावळत्या संध्याकाळी तिनी दिलेले आलिंगन तो सांभाळू शकला नाही, म्हणून डॉ. काळे,

"उस चिज का क्या जिक्र जो मुमकिन नही है
सहरामे कभी साया ए दिवार मत मांगो."

पुढे एका प्रश्नाचं उत्तर देताना ग्रेसांनी ग्रेस हे नाव वर आणल्याचं ते सांगतात आणि " मी ग्रेसांसाठीच  माझ्या निर्मितीच्या अंतर्विश्वाचे प्रतिनिधित्व करणारे नाव  कायम केले" असे ते सांगतात.

**सांध्यपर्वातील वैष्णवी**

**अर्पण पत्रिका**

आत्म्याच्या नितळ
काचेवर
पडलेले त्या नदीचे
संध्याकालीन प्रतिबिंब
नंतर हलत राहिले
हलतच राहिले;

नात्यागोत्याची नसलेली
चार परकी माणसे
वाळूवर मी आणि तुझा
पिंड
हैराण झालो, चौघेही
फक्त एक खार इकडून
तिकडे निघून गेली
नदीवर डोळे ठेवून मी
तिची
करुणा भाकू लागलो

माते धाड त्याला! धाऽऽड
त्याला..
झाडीमागून तो आला आणि
तुझा पिंड स्पर्शून गेला
तुझ्या या सरितापर्वात
आठवतेय ती नदी
आणि कृतज्ञतेने
भारावून गेलेले माझे
लहानसे शरीर.

त्या नदीला नाही,
तुलाही नाही
संध्यापर्वातली वैष्णवी
अर्पण करायची
त्या कावळ्याला...

मी अर्पण करतोय त्याला...
–ग्रेस

संदिग्ध घरांच्या ओळी
आकाश ढवळतो वारा
माझ्याच किनाऱ्यावरती
लाटांचा आज पहारा

– कवि ग्रेस

"या वाटेवर रघुपती आहे
त्या वाटेवर शिळा
सांग साजणी कुठे ठेवू मी
तुझा उमलता गळा"

– ग्रेस

# "ग्रेस"फुल



*Experince is the death of that incommunicable mystory: to communicate you need a word, a guesture, a look, but to be in communication with that a mind & whole of you must be at the same time with the same intensity as that which is called mysterious*

*Grace*

## भय इथले संपत नाही

भय इथले संपत नाही
मज तुझी आठवण येते
मी संध्याकाळी गातो
तू मला शिकविली गीते

ते झरे चंद्र सजणांचे
ती धरती भगवी माया
झाडांशी निजलो आपण
झाडांत पुन्हा उगवाया

तो बोल मंद हळवासा
आयुष्य स्पर्शूनी गेला
सीतेच्या वनवासातील
जणू अंगी राघव शेला

स्तोत्रात इंद्रिये अवघी
गुणगुणती दुःख
कुणाचे
हे सरता संपत नाही
चांदणे तुझ्या स्मरणाचे
–ग्रेस

स्वप्नांना साजण नव्हते
दुःखाना नव्हता धावा
कृष्णावर संकट येता
राधेने गिळला पावा...
–ग्रेस

हले काचपात्रातली वेल साधी
निनादून घंटा अशा वाकल्या
खिळ्यांना कळे ना कुठे क्रुस न्यावा
प्रभूच्या अशा पापण्या झाकल्या....
–ग्रेस

आता तक्रारच नाही
तुम्ही शांतपणे जगा
पण देठ तोडताना
ठेवा फुलासाठी जागा
–ग्रेस

*In the quite stillness of an evening*
*That, which is, everlasting beauty comes*
*Uninvited, unsought, without the*
*Noise of recognition...*
*-Grace*




*" Grace, a man who never asks for an inch less or an inch more than he was, he is and he will"*
*- Grace.*

## हळूवार

( कवी ग्रेस यांना
भेटल्यावर
त्यांच्याबद्दल उत्स्फूर्त
आलेले शब्द )

तो नवयूगातला प्राचीन
आजही ज्याची निष्पापता
कायम आहे
भयाच्या भयावह मुठीत
विनाकारण...

तो स्वधर्म शिरोधारी
ज्याचे आंतशारीर गाते
जीवन गीतांचे सूर
परिक्षितापरिक्षितावर

तो प्रवासी प्रवासाचा
ज्याच्या पायास स्पर्शते
धूळ वाटेची
अन वाट पायांना

तो उलगडत जातो
त्याला स्वतःला
जीवनाच्या जाणीवेच्या
रटाळ ओंगळवाण्या
सत्यानंतर



तो जाणतो त्याच्या
उंची खोलीचे मापदंड
आणि प्रार्थितो
ईश्वराकडे
त्याचे स्वतःचे मोजमाप

सांधतो तुटताना
तुटतो सांधताना
कातरवेळा
एकमेवाव्दितीय
अथांगतेचा डोही
प्रश्नराशीला
उत्तराइतकाच
सरल

मी समजून घेण्याचा
प्रयत्न करत आहे....

हळूवार..अगदीच
हळूवाऽऽर

सौ. सुरुचि नाईक

***–ग्रेस भेट.....***
***नव्हे, ही तर***
***"ग्रेटभेट"***

## काजळडोह

दूर डोंगरात घन कोसळला
लोचनी माझ्या डोह आसुसला

हुंदका दाटला जीव कासावीस
दारी उभी माझ्या निःशब्द सांज

तिमिरी भयाण जळे मंद सांजवात
सांडोनी कनक माझ्या खोल अंतरात

विझले वणवे दूर निबीड जंगलात
भावनांचे निखारे देती
काळोखाची साथ

शाकारू किती कसे माझे मोडके
छप्पर
खोल उतरली ओल ओलावून अंतर

सावरले मन शोधी भोगांचे प्राक्तन
भेगाळल्या हृदयात फडफडे बेचैन

पाउस वादळ बाहेर अंतर्यामी
ठसे उठले मोहोळ भिजरे प्राणांतिक

कासया दयाळा दिधले हे दान
आक्रंदे देही ना साहवे पक्षिण

सोनाली घाटपांडे

## मृत देहास

गर्दीत हरवले कोण
उसवते वीण
जाणवे शीण
मृत देहास

गर्दीत थबकले पाय
हंबरे गाय
कशाचे काय
मृत देहास

गर्दीत आसवे काही
काळजी वाही
उन्हाची लाही
मृतदेहास

गर्दीत कुणाचे कोण
आसवे दोन
बोलतो व्योम
मृतदेहास

गर्दीत जातसे हरी
खांदयाच्या वरी
सुमनांच्या फेरी
मृतदेहास

–वर्षा पाटिल

## प्रवास

शब्द तो अनुरागे
देहातील ही परिभाषा
रे गंध निळासा जोगी
चल नव्या खुणवती दिशा

तू पहा फुलांशी वेग
की गर्द मनाशी चाळा
आवेश बांधता भोगी
चैतन्याच्या ज्वाळा

हया रणरणत्या चाहूली
ती अशी मोहिनी होते
ते रंग रंग तुटलेले
क्षितिजावर ओतूनी जाते

घे प्राण तुझे नी माझे
कुठलाच भरोसा नाही
हया पुढल्या वाटेवरती
कुठलाच आडोसा नाही

–भूषण महाजन
(भूराम)

## मन उदास उदास

मन उदास उदास
आर्त पुकार कोणास
हे कसले आभास
का चांदणे पेटले?

सारा हल्लोळ कल्लोळ
आज लागलेय खूळ
कुणा आठवणींचे रान
आज अश्रुंनी पेटले

रात हंबरून येते
दाटे काळोख उरात
चिंब भिजले कागद
असे काव्याने पेटले

सखे तुझ्या दारी
त्याची आलिये वरात
माझं स्वप्न हळवं सुखद
हिरव्या चुडयात पेटले

– सूरज देशपांडे.

*So called tragedies are always movable because I understand all those designs of manners and cultural mannerism but I fail to note that sharp agony of all unfinished sentences..........*

*They never come on the shameful surface*

*_ Virani Grace*

## तुज एकांती स्मरताना

तुज एकांती स्मरताना
सावल्या लागती मागे
निस्तब्ध होतसे सांज
तुटतात सावळे धागे

तुटण्याची सुन्न भाषा
सहज मलाही कळते
आलिंगन  गहिवरलेले
डोळ्यातुन पाणी गळते

दचकुनी थांबतो वारा
त्याच्याही येते कानी
मघा उडविला पाचोळा
तसेच राहिले पाणी



पाण्यातूनही अंधार
ना ओल दिसे ना दिवा
दग्धता गूढ तळाशी
शोधत फिरे काजवा

तो भिरभिर फिरताना
चांदणे येतसे खाली
सरकती मेघही पुन्हा
अंधार पुन्हा भवताली

"स्वरनक्षत्र" मागते भोळी
माझाही ताबा सुटतो,
या अंधारातही कैसा
कवितेला हद्ट सुचतो

—सचिन काकडे

## मातले मातले

मातले मातले
खजूराहो लेणे
आणि देहदेणे
आतुरले

आत्म्याचे अभंग
पुस्तकात बंद
मंदीर सबंध
शहारले

—गुलशनाबादी

## शुक्राची चांदणी

मठात लपून बसलेल्या
साधूच्या चेहऱ्यावर पसरलेल्या
चांदण्यात चंद्र शोधताना
शिशिरातील पानगळीत सापडलेले
हिरवे पान तपासत राहिले
तेच जगण्याचे जुने संबंध

डोक्यावर आभाळ ओढून घेण्याचा
केविलवाणा प्रयत्न करणारे
उघडेबोडखे दुर्लक्षित खेडे

या साऱ्यांमधे भिजत पडलेल्या दुःखांची
परिसीमा शोधताना आयुष्याच्या साऱ्या
सीमा दूर गेल्या होत्या.

अगदी दूर
क्षितिजाच्या
पार....
आणि दिसत राहिली
तीच
धूसर रेषा
आणि
त्यावर चमकणारी
दिमाखदार
शुक्राची चांदणी.

—अनिल बिहाणी.

## मुक्या आक्रोशाने

कसे वाहते अंतरातून पाणी
फिरोनी त्याच वेदनेच्या दिशेने
का बोलती ही सतारीतून गाणी
मर्म तुझे भेदण्याच्या मिशेने

तुझा ठाव नाही मला गाव नाही
तरी जोडले मी प्राक्तनांच्या रेषेने
तुझा भाव पाही तुझे घाव साही
आठवू की विसरू मी कशाकशाने

तुझी याद अशी मनी कोरलेली
उफाळून ये जराश्या नशेने
वास्तवाची जाण जरी फाटलेली
गिळावे आवंढे कोरडया घशाने

तुझा दोष नाही, मला होश नाही
इथे साजरी “तू” होते जल्लोशाने
माझा रोष नाही, शब्दघोष नाही
घूमू दे आभाळ “मुक्या आक्रोशाने”

–अरुण नंदन




## तू गेलीस.....

.
.
.
तू गेलीस माझे गाणे
अर्थ्यावर टाकून गेलीस
माझ्या हृदयाचे तुकडे
वाऱ्यावर फेकून गेलीस

तू गेलीस तेव्हा रिमझिम
पाऊस निनादत होता
हा ग्रेस कितीदा आपण
एकत्र वाचला होता

हा ग्रेस ही आता माझे
जगणे पाहून हसतो
कधी कधी मी लिहिता
शब्दांना अर्थच नसतो

दुःखाचा सुगंध माझ्या
कवितांना देऊन गेलीस
तू गेलीस

तुषार जोशी

*क्षितिज जसे दिसते*
*तशी म्हणावी गाणी*
*अंगावरची त्वचा आंधळी*
*छिलून घ्यावी कोणी*

*गाय जशी हंबरते*
*तसेच व्याकूळ व्हावे*
*बुडता बुडता सांजप्रवाही*
*अलगद भरुन यावे.*
*– ग्रेस.*




# अतिथी संपादकांचे शब्द.

सर्वप्रथम सर्व नेटाक्षरी चमू चे अभिनंदन!

खरं तर माझा आणि इंटरनेटचा काहीही संबंध नाही. सुरुचि जेव्हा इंटरनेट बद्दल बोलल्यात तेव्हा मला फारसा रस वाटला नाही. केवळ माझ्या एका विदयार्थिनीची बालमैत्रिण आणि माझी एक वाचक म्हणून मी त्यांना भेटण्याची परवानगी दिली, मात्र त्यांनी सोबत आणलेली नेटाक्षरीची पुस्तिका पाहून इंटरनेटच्या प्रभावी माध्यमाचा परिचयच झाला, आणि मी अतिथी संपादक म्हणून स्वीकृती दिली.

गेल्या कित्येक वर्षापासून या क्षेत्रात काम करित असल्याने काव्य हे माझ्या जीवनाचे एक अंग झाले आहे. अनेकांची काव्यशैली मी या आधीही अभ्यासली आहे, आणि म्हणूनच नेटाक्षरी पाहताना मला आनंदच झाला मात्र अशा प्रकारची “मराठी चळवळ” आजची पिढी उचलून धरत आहे हे जास्त कौतुकास्पद आहे असे मला वाटले

दुसरी आनंदाची बाब म्हणजे या नेटाक्षरीचा विषय! ग्रेस हे आमच्या काळातील अनवट प्रतिभेचे कवि.त्यांच्या काव्याचा मर्मग्राही वेध घेणारे फार थोडे असतील. त्यांच्या गूढतेची उकल व्हावी म्हणून घेतलेली त्यांची प्रदीर्घ मुलाखत म्हणजेच “ग्रेसविषयी” . माझ्या साठी हा विषय ही बाब आनंदाचीच आहे कारण माझ्या गाठीशी असलेल्या अनेक आठवणींचा तो उजाळा आहे!

पुन्हा एकदा सर्व वाचक,व चमूचे अभिनंदन! नेटाक्षरीस अनेक हार्दिक शूभेच्छा.

डॉ. अक्षयकुमार काळे.

## मी, कवी ग्रेस आणि संध्याकाळ.... एक ग्रेट (ग्रेस)भेट

१२ जानेवारी २००९, दुपारी कवी ग्रेस ना फोन केला. त्यांना माझ्याबद्दल माहिती दिली आणि भेटण्याची वेळ पक्की केली ती दुपारी ४ वाजताची. ठरल्याप्रमाणे मी जाऊन पोहचले.. त्यांच्या घरासमोर ची पाटी वाचून फार आश्चर्य वाटलं, तीवर लिहिलं होतं

I am free but I am not available

बाजूलाच त्यांच एक व्यंगचित्रही होतं.. इतक्यात त्यांनी दार उघडलं, मी आत गेले. आतलं दृष्य भारावून टाकणारं होतं.. सगळीकडे आप्तमित्रांची छायाचित्रे, कवितांचे फलक आणि पारितोषिकं ठेवलेली होती.

"या या, बसा..." त्यांनी माझं स्वागत केलं आणि आमचा संवाद सुरु झाला.

मी– "घर छान ठेवलयत तुम्ही.."
ग्रेस–"अहो कुणी काही ठरवून करत नसतो, मला भेटायला जे येतात ते ठेवून जातात फोटो बाकी काही नाही" No one makes nothing madam, it all happen!

तितक्यात फोन वाजला, मला खूण करत त्यांनी फोन घेतला... नंतर ते म्हणाले, "तुम्ही थांबू शकता... तो फो थांबवणं योग्य नाही.. पुढच्याला काही महत्वाचे काम असेल तर त्याच्यावर अन्याय होईल न?"

***त्यांच्या बोलण्यातून त्यांचे जगण्याविषयीचे काही नियम आहेत हे मला स्पष्ट जाणवले... त्यांच्या कवितेव्यतिरिक्त त्यांच्याकडुन त्यांच्याबद्दल जाणून घेण्याचा हा माझा पहिला प्रसंग!***

**मी–** "फार आपुलकीनी बोलता तुम्ही"
**ग्रेस–** "माझ्या बोलण्यात आपुलकी जाणवते ती किमया माझ्या आईची आणि माझ्या परमेश्वराची...तुम्हाला सांगतो, परमेश्वर नाही असं मी या जन्मात तरी म्हणू शकत नाही"
**मी–** हो.. तो तर आहेच..
**ग्रेस– आपुलकी वगरे कोण ठरवतो हो? मी प्रवाही प्रवृत्तीचा आहे, मी प्रवाह थांबवत नाही तुम्ही जोवर माझा हात धरलात तोवर मी तुमच्या सोबत आहे.. तुम्ही हात सोडलात की सुटलात!**

बोलता बोलता त्यांनी मला अनेक फोटो दाखवले, आता औपचारिकता कमी होवू लागली

**ग्रेस–** पण तुम्ही मला आजच भेटायला का आल्या? या आधी का नाही

**मी–** तुमच्या कविता मला नवीन नाहीच, शिवाय तुम्ही नागपुरात असता हे देखिल मला माहित होतं, पण या आधी मला तुम्हाला भेटावं असं वाटलं नाही, आजही नेटाक्षरी बद्दल बोलायचं होतं पण आधी ओळख होवूदेत.. मग बोलू

**ग्रेस–** तुम्ही प्रामाणिक आहात हे पाहून बरे वाटले, नाहीतर लोक उगाच खोटे बहाने करतात.. त्यांना इथे मज्जाव आहे.. बाहेरची पाटी तुम्ही वाचली असेलच ना?**आणि सांगतो सुरुचि जी.. प्रत्येक भेटीमागे ठराविक कारण असतात.. ती आली की भेट होतेच! कारण भेट ही लादल्या जाऊ नये.. ती व्हावी, तुम्ही कंटाळात तर सांगा.. कारण मग तुम्ही पुन्हा येणार नाही... स्पष्ट सांगा कारण माझी भेट तुमच्यावर लादल्या जायला नको.**
मी– हे तर तुमच्याही बाबतीत लागू पडते.. माझे प्रश्न तुम्हाला त्रासदायक तर वाटत नाही ना..

**ग्रेस–** नाही, तुमच्या प्रामाणिक पणावर विश्वास ठेवावा असं मला वाटतं आहे.. मी पहिल्याभेटीत कुणाशीच इतकं मोकळं बोलत नाही...तरीही मी कंटाळलो तर तुम्हाला तसं सांगेन.

**व्यक्ति स्वातंत्र्य जपणे हा त्यांच्या जगण्याचा अजून एक पैलू मला जाणवला..**

बोलताना मधे मधे ते “तुम्ही कंटाळलात तर नाही ना?” असं विचारत होते..
**मी–** नाही कंटाळत आहे मी.. पण तुम्ही सारखं असं का विचारताय?
**ग्रेस–** त्याची एक गम्मतच आहे.. ज्याच्याशी माझी वेवलेंथ जमते ना त्याच्याशी मी खूप बोलतो..माझा मूड लागला की मला भान राहात नाही... म्हणून विचारतो हो.. अहो एकदा असच झालं.. पुण्याला एका कार्यक्रमात माझं व्याख्यान होतं, नंतर हृदयनाथचं गाणं होतं... मी बोलायला लागलो.. थोडया वेळानं पाण्याच्या ग्लासखालून माझ्या हातात एक चिठ्ठी सरकवल्या गेली.. त्यात लिहिलं होतं

“ ग्रेस, गेले दोन तास तुम्ही बोलत आहात.. आजच्या कार्यक्रमात मला एक तरी गाणं म्हणू देत!
–हृदयनाथ”
माझं हे असं आहे हो... बरं चहा कॉफी काय करू?
**मी–** नाही.. नको...
**ग्रेस– बरं पण ग्रेस ने पाहुणचार केला नाही असं म्हणू नका.. कारण ग्रेस, त्याच्या कविता आणि त्याचा सभ्यपणा यावर कुणी बोट ठेवू नये याची खबरदारी मी घेत असतो**
त्यासाठी गेल्या ४० वर्षापासून माझी सर्व कामं मी स्वतःच करतो...अगदी स्वयंपाक पण!
**मी –** बापरे.. स्वयंपाक पण करता तुम्ही...ग्रेट... कमाल आहे...
**ग्रेस–** No no Suruchi jee... please do not use the words like “Great”...I am only Grace....not an inch more than Grace, not an inch less than Grace..only Grace...

अजूनही बऱ्याच गप्पा झाल्या.. संध्याकाळचे सात कसे वाजले समजलच नाही. पण एक मात्र समजलं....हे वेगळं व्यक्तिमत्व आपल्या आत अनेक जीवनकला घेऊन सजलं आहे...त्याला समजून घेणं म्हणजेही एक कला...
ही कला आत्मसात करण्याचं बळ ईश्वर आम्हास देवो व ग्रेस यांना उदंड आयुष्य लाभो ही प्रार्थना.

–सौ. सुरुचि नाईक

# श्रद्धांजली

३ मे २००९ नागपूर चा रणरणता उन्हाळा लाही लाही करत असतानाच दुःखाच्या असह्य चटक्यांनी नागपुरकर आणि समस्त मराठी जनता होरपळून निघाली. हा दुःखद क्षण होता विद्यावाचस्पती श्री राम शेवाळकर यांच्या निधनाचा. ह्रदयविकाराचा तीव्र झटका त्यांची प्राणज्योत मालवून गेला.



एका खळखळत्या प्रवाहाचं व्यक्तिमत्व असं अचानक अबोल झालं. वाग्देवी आणि सरस्वती हातात हात घालून जिथे वास्तव्यास येतात ते ठिकाण म्हणजे राम शेवाळकर. सुरेश भटांच्या गझलांचे अंतरंग उलगडणे असो किंवा ग्रेस यांच्या गूढतेचे आकलन असो शेवाळकरांची रसाळवाणी श्रोत्यांना शब्द रसात चिंब केल्याशिवाय रहात नसे

संत वाङमयाचे अभ्यासक, लेखक, समिक्षक प्राचार्य राम शेवाळकर यांचे समर्थ रामदास, संत तुकाराम, संत ज्ञानेश्वर यांच्यावरील निरूपण पूर्णत्वाचा आनंद देते तर 'विनोबा भावे' व 'साम्ययोगी विनोबा' या चरित्रातून सखोल तत्वज्ञानाची प्रचिती येते. याशिवाय 'अंगारा','असोशी' रेघा हे काव्यसंग्रह तर 'माहेरचे दिवस', रांगोळी, स्नेहगोत्री ही आत्मकथन आणि अमृतझरी, रामसेतू यासह अनेक अनुवादीत पुस्तकं व ललित त्यांच्या नावे आहे.

१९९४ मध्ये पणजी इथे झालेल्या अखिल भारतीय साहित्य सम्मेलनाचे ते अध्यक्ष होते, तसंच जागतिक मराठी सम्मेलन, जागतिक कीर्तन संमेलन, मराठी संत साहीत्य संमेलन, स्वातंत्र्यवीर सावरकर साहित्य संमेलन या संमेलनांची अध्यक्ष पदं ही त्यांनी भूषवली. विदर्भ साहित्य संघ नावारूपाला आणण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता.

या कार्याचा गौरव म्हणून त्यांना अनेक मान सन्मान प्रदान करण्यात आले होते. 'मॅन ऑफ़ दि इयर' हा अमेरिकेचा पुरस्कार, बोस्टन येथील संस्थेतर्फ़े साहित्य धुरंधर, दीनानाथ मंगेशकर प्रतिष्ठान चा कुसुमाग्रज पुरस्कार, नागपूर विद्यापीठाची डी लिट. पदवी , डॉ. राधाकृष्णन पुरस्कार, समाजभूषण पुरस्कार, विदर्भ गौरव पुरस्कार, विदर्भ भूषण पुरस्कार, जीवनव्रती पुरस्कार नागभूषण पुरस्कार हे त्यापैकी काही.

मराठी साहित्य समृद्ध करणा-या ज्ञानतपस्वी शेवाळकरांच्या निधनानं साहित्यविश्व पोरकं झालं आहे. ही पोकळी कधीही भरून न निघणारी आहे. त्यांच्या निधनामूळे साहित्य विश्वावर शोककळा पसरली आहे. अशा तेजस्वी व्यक्तीमत्वाला नेटाक्षरी ची भावपूर्ण श्रद्धांजली.

## काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

=================================

## नवरस काव्यस्पर्धा मालिका

=================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ़'हा नाही, कोणी छोट - मोठं, कविता चांग़ली वाईट सिध्द करण हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवड्क कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.

लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

=================================

## या महिन्याचा 'रस'विषय रसराज 'हास्य'

=================================

तुमच्या १/२ 'हास्य' कविता आम्हाला १५ मे २००९ पर्यंत
**marathikavitamarathispardha@gmail.com**
वर पाठवा. सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे netaksharee@gmail.com